राज्य कामगार विमा योजना पाचपावली,
नागपूर येथे सेवा दवाखाना बांधण्याचे
नकाशे व खर्चाचे अंदाजपत्रक यांना
प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः राकायो-२०१५/प्र.क्र.२३२/१५/राकावि-२,
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, संकूल इमारत, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१,
दिनांक :- २० ऑगस्ट, २०१५.

वाचा :-

१) शासन निर्णय,वित्त विभाग, क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम,दि.१५ मे,२००९ चे परिशिष्ट वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८,
२) शासन परिपत्रक,नियोजन विभाग,क्र. ससमा-२०१०/प्र.क्र.४८/का-१४६१,दि.३०/०१/१२,
३) अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ,नागपूर यांचे पत्र जा.क्र.तां.वि./प्र. अ.३/ १२७६,दिनांक-२४/०२/२०१५,
४) आयुक्त,राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांचे पत्र क्रमांक-आयुक्त/राकावियो/का.क्र.५/ बगडगंज/से.द. /भुखंड/बांधकाम/१४७-१४९/१५,दिनांक-१६ मार्च,२०१५.

प्रस्तावना :-

पाचपावली,नागपूर ही जागा ४६ वर्षे जुनी आहे. सदर ठिकाणी सेवा दवाखाना बांधण्याबाबतचे रुपये-३,६८,४९,८९२/- इतक्या खर्चाचे अंदाजपत्रक व नकाशे अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ,नागपूर यांनी आयुक्त, राज्य कामगार विमा योजना यांचे मार्फत शासनास मान्यतेसाठी सादर केले आहेत. सदर नकाशे व अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

शासन आता या निर्णयाद्वारे पाचपावली,नागपूर येथे सेवा दवाखाना बांधण्याच्या **रुपये-३,१६,८५,९६०/-** (रूपये तीन कोटी, सोळा लाख,पंच्याऐंशी हजार, नऊशे साठ फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास खालील अटींच्या अधीन राहून व खालील विवरणपत्राप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

(अ) काम सुरू करण्यापुर्वी सदर अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाचे संबंधित मुख्य अभियंता यांच्याकडून साक्षांकित करून घ्यावे.

(ब) काम सुरू करण्यापूर्वी मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तूविशारदांकडून मंजूरी घेऊनच काम सुरू करावे.

(क) काम सुरू करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करून घ्यावी.

(ड) ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.

(इ) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

(ई) तांत्रिक मान्यता देताना ( Windows साठी ) वायर मेशची व्यवस्था करावी.

## विवरणपत्र

| Sr.No. | Particulars | Amount in Rs. |
|---|---|---|
| 1 | Cost of Civil Work | 19861277.00 |
| 2 | Add 4% Contingencies | 794451.00 |
| 3 | Add 4 % Centage Charges, | 794451.00 |
| 4 | Add 5% Water Supply & Sanitory arrangement | 993064.00 |
| 5 | Add Ground Development Charges (Lump Sum) | 300000.00 |
| 6 | Add 5 % Electrification | 993064.00 |
| 7 | Add for Rain Water Harvesting (Lump Sum) | 300000.00 |
| 8 | Add for Approach road (Lump Sum) | 500000.00 |
| 9 | Add for Furniture | 2500000.00 |
| 10 | Add 0.25% For Soil investigation | 49653.00 |
| 11 | Add for Parks & Garden (Lump Sum) | 200000.00 |
| 12 | Add for Fire Fighting Equipments (Lump Sum) | 200000.00 |
| 13 | Transformer,Generator,Supply Charges & External Electrification. | 2500000.00 |
| 14 | Water main,storage & pump house,Borewell etc. | 1500000.00 |
| 15 | Parking arrangements,sheds | 200000.00 |
| | **Total** | **3,16,85,960.00** |
| | **Say Rs.** | **316.86 Lakhs** |

३. सदर बांधकामासाठी अर्थसंकल्पात तरतूद केल्यानंतरच बांधकाम हाती घेण्यात यावे.

४. सदर बांधकामावरील खर्च " मागणी क्र.आर-१,सार्वजनिक आरोग्य विभाग,२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा (विषम चिकित्सा),१०२-राज्य कामगार विमा योजना,१०२-१-बृहन्मुंबईतील व मुफसल क्षेत्रातील राज्य कामगार विमा योजना, (०१) (०३)- राज्य कामगार विमा योजना रुग्णालय (२२१० १४० २), २७ लहान बांधकामे या अर्थशीर्षाखाली उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. शासन निर्णय,वित्त विभाग क्रमांक-विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम,दिनांक-१५ मे,२००९ चे परिशिष्ट वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८,भाग पहिला,उपविभाग-पाच,अनुक्रमांक १,महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ व शासन परिपत्रक,नियोजन विभाग क्रमांक-ससमा २०१०/प्र.क्र.४८/का.१४६१,दिनांक-३० जानेवारी,२०१२ अन्वये प्रशासनिक विभागांना सदर बाबतीत असलेल्या पूर्ण अधिकारांचा वापर करुन व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३८६/१५/इमा-३, दि.१३/०८/२०१५ अन्वये मिळालेल्या सहमतीने शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२०१२४६१३६२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Vijay Sadashiv Brahmane

Digitally signed by Vijay Sadashiv Brahmane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijay Sadashiv Brahmane
Date: 2015.08.21 15:46:20 +05'30'

**( वि.स.ब्राह्मणे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त,राज्य कामगार विमा योजना,मुंबई,
२. संचालक, राज्य कामगार विमा योजना, मुंबई,
३. वैद्यकीय अधिक्षक,राज्य कामगार विमा योजना रुग्णालय,सोमवारी पेठ,नागपूर.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा),महाराष्ट्र-२,नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी,नागपूर.
६. जिल्हा कोषाधिकारी,नागपूर.
७. मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग ,नागपूर.
८. अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंड,नागपूर.
९. कार्यकारी अभियंता, एकात्मिक घटक (एम), सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.
१०.वित्त विभाग /सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई -४०० ०३२.
११.अर्थसंकल्प शाखा,सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई-१.
१२.निवड नस्ती (राकावि-२ कार्यासन),सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई.